**नांदेड उर्दू घरासाठी नियुक्त कर्मचाऱ्यांचे मानधन, देखभाल दुरुस्ती व परिचालन, इत्यादीसाठी वर्ष २०२१-२२ या आर्थिक वर्षात निधी वितरित करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नाउघ २०२०/प्र.क्र.६०/का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७.०२.२०२२

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अर्थस-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टोंबर,२०२१.
३) जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र क्रमांक अल्पसंख्याक/सा.शा-१/उर्दू घर/CR/०१/९३४, दि.०५.०१.२०२२
४) जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र क्रमांक अल्पसंख्याक/सा.शा-१/उर्दू घर/CR/०१/७२६०, दि.०२.०२.२०२२

**प्रस्तावना -**

नांदेड उर्दू घरासाठी बाहययंत्रणेने घेतलेले कर्मचारी यांचे मानधन, उर्दू घराची देखभाल दुरुस्ती व परिचालनासाठी उर्दू घरातील ग्रांथलयासाठी पुस्तक खरेदी व इतर खर्चसाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे..

## शासन निर्णय -

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यातील उर्दू घरांचा वापर, देखभाल व दुरुस्ती तसेच उर्दू घरे सुस्थितीत ठेवण्यासदंर्भात नियामवली विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार उर्दू घरांचे नियंत्रण व व्यवस्थापन संबंधित जिल्हाधिकारी किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले, उप-जिल्हाधिकारी पेक्षा कमी नाही अशा दर्जाचे अधिकारी, यांचे मार्फत करण्यात येणार आहे. त्यानुसार जिल्हाधिकारी, नांदेड यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ व ४ येथील पत्रान्वये, अनुदान वितरित करण्यासाठी मागणी सादर केली आहे. उर्दू घर या प्रयोजनासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.७.०० कोटी (रुपये सात कोटी फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. १ व २ येथील मान्यता आणि वित्त विभागाने अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेले अनुदान विचारात घेऊन खालील प्रयोजनासाठी रु.१,१६,९६,६८८/- (रुपये कोटी सोळा लाख शाहण्णव हजार सहाशे अठ्ठयाऐंशी मात्र) इतके अनुदान जिल्हाधिकारी, नांदेड यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, नांदेड यांनी सदर खर्च विहीत मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>बाब</th><th>अंदाजित किंमत</th></tr>
<tr><td>१</td><td>ग्रंथालयासाठी न्युज पेपर चा खर्च माहे दि.०३.०९.२०२१ ते ३१.०३.२०२२</td><td>१९,४६०/-</td></tr>
<tr><td>२</td><td>कंत्राटी कर्मचारी यांचे मानधन
<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>पद</th><th>उपस्थिती कालावधी</th><th>मानधन</th></tr>
<tr><td>१</td><td>व्यवस्थापक</td><td>दि.१२.०७.२०२१ ते दि.२६.०८.२०२१</td><td>रु.५३,६६६/-</td></tr>
<tr><td>२</td><td>ग्रंथपाल</td><td>दि.१२.०७.२०२१ ते दि.३१.०३.२०२२</td><td>रु.२,१६,६६७/-</td></tr>
<tr><td>३</td><td>लिपिक कंत्राटी</td><td>दि.०२.०२.२०२१ ते दि.३१.१२.२०२१ व दि.०२.०१.२०२२ ते दि.३१.०३.२०२२</td><td>रु.२,१०,०००/-</td></tr>
<tr><td>४</td><td>व्यवस्थापक</td><td>दि.०१.०१.२०२२ ते दि.३०.११.२०२२</td><td>रु.१,०५,०००/-<br>(मागणी दि.३१.०३.२२ पर्यंत)</td></tr>
</table></td><td>५,८५,०००/-</td></tr>
<tr><td>३</td><td>पाणी व वीज बिल</td><td>६७,०६५/-</td></tr>
<tr><td>४</td><td>कार्यालयीन व आकस्मिक खर्च</td><td>५,०००/-</td></tr>
<tr><td>५</td><td>ग्रंथालयासाठी प्रिंटीग व लेखन साहित्य</td><td>१२,०००/-</td></tr>
<tr><td>६</td><td>उर्दू घरासाठी स्टेशनरी, प्रिंटींग व लेखन साहित्य</td><td>२२,०००/-</td></tr>
<tr><td>७</td><td>सांस्कृतिक समिती व उप समिती सदस्यांचे मानधन</td><td>२०,०००/-</td></tr>
<tr><td>८</td><td>उर्दू घर नेटवर्कीग (वायफाय सुविधा अणि ई लाब्रयरी)</td><td>१,४०,०००/-</td></tr>
<tr><td>९</td><td>या कार्यालयाचे पत्र जा.क्र.१३६११ दि.०४.०३.२०२१ नुसार उर्वरित निधी (यापूर्वी दि.३१.०३.२०२१ च्या शासन निर्णयामधून वितरित करुन शिल्लक राहिलेले खालीलप्रमाणे अनुदान)
<table>
<tr><td>१</td><td>उर्दू घर येथे प्रोजेक्टर, सिस्टीम व साऊंड सिस्टीम उभारणी करणे</td><td>रु.४,१९,७६३/-</td></tr>
<tr><td>२</td><td>उर्दू घरासाठी अतिरिक्त फर्निचर, लॉन इत्यादी.</td><td>रु.२०,४३,४००/-</td></tr>
<tr><td>३</td><td>उर्दू घर येथील ग्रंथालयासाठी पुस्तके व डिजीटल ग्रंथालय उभारणी करणे</td><td>रु.१८,६८,०००/-</td></tr>
<tr><td></td><td></td><td>४३,३१,१६३/-</td></tr>
</table></td><td>४३,३१,१६३/-</td></tr>
<tr><td>१०</td><td>उर्दू घर येथे सोई सुविधा उपलब्ध करुन देणे व देखभाल दुरुस्तीसाठी बाहययंत्रणेची नियुक्ती</td><td>६४,९५,०००/-</td></tr>
<tr><td></td><td>एकूण</td><td>रु. १,१६,९६,६८८/-</td></tr>
</table>

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टामधील अ.क्र.(९) येथील अटींबाबत शाहनिशा करुन जिल्हाधिकारी, नांदेड यांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रु.१,१६,९६,६८८/- (रुपये कोटी सोळा लाख शाहण्णव हजार सहाशे अठ्ठयाऐंशी मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्पीय प्रणालीमधून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

त्यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे.

यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००- इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (कार्यक्रम)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०२१/ प्रक्र. ४८/अर्थ-३, दि.६ एप्रिल, २०२१, अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ आणि अर्थस-२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.१४ ऑक्टोंबर,२०२१ अन्वये प्राप्त प्राधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१७११४८३९३३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2022.02.28 12:57:04 +05'30'

**( सं. छ. तडवी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर,
२. आयुक्त, औरंगाबाद महसूल विभाग, औरंगाबाद,
३. जिल्हाधिकारी, नांदेड,
४. अतिरिक्त जिल्हाधिकारी, नांदेड
५. आयुक्त, नांदेड वाघाळा महानगरपालिका, नांदेड,
६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,
९. अधीक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई,
१०. खाजगी सचिव, मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (अ.वि.वि.) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
११. स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. स्वीय सहायक, सह सचिव (अ.वि.वि.),अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. वित्त विभाग / नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.